# डॉल्फिन

मैत्रीची खरी गोष्ट



# डॉल्फिन

## मैत्रीची खरी गोष्ट



मराठी : अश्विनी बर्वे

विंटर नावाची एक खूप खास डॉल्फिन आणि सॉयर नावाचा मुलगा यांच्यामधल्या मैत्रीची खरी गोष्ट.





एक दिवस, सॉयर आपली सायकल चालवत होता, तेव्हा त्याला समुद किनाऱ्यावर एक डॉल्फिन पडलेला दिसला. विंटर समुद्रात पोहत होता,पण तो किनाऱ्याच्या खूप जवळ आला. तेव्हा त्याची शेपटी कोळ्याच्या जाळ्यात अडकली.

विंटर खूप त्रासला होता. सॉयरला दिसलं की डॉल्फिनला जखम झाली आहे आणि त्याच्या लक्षात आलं की माशाला मदत करायला हवी.

सॉयरला आठवलं की त्याच्या बॅगेत एक छोटा चाकू आहे. त्याने चाकूच्या साहय्याने विंटरला जाळ्यातून मुक्त केलं. विंटरने सायरला पाहिलं आणि एक हलकीशी शिट्टी वाजवली. जसं की तो आभार मानत होता.





लवकरच स्थानिक मरीन दवाखान्यातून बचाव कर्मचारीही आले, ते विंटरला घेवून दवाखान्यात गेले. दुसऱ्या दिवशी सॉयर विंटरला भेटण्यासाठी दवाखान्यात गेला. तिथं त्याची ओळख डॉक्टर हास्कटची मुलगी हेज़लशी झाली. डॉक्टर हास्कट, मरीन हॉस्पिटल चे प्रमुख होते.



विंटर, एका मोठ्या तळ्यात फीबी बरोबर होता. सॉयरने त्याच्याकडे बघितले तेव्हा त्याच्या लक्षात आले की, फीबी, डॉलफिनची ट्रेनर् होती. विंटरच्या शेपटीला एक पट्टी बांधली होती. विंटरचे डोळे मिटलेले होते आणि तो बिलकुल हलत-डुलत नव्हती.

जसा सॉयर फीबीशी बोलू लागला तसे विंटरने आपले डोळे उघडले. त्याने सॉयरकडे बघितलं आणि परत एक हलकीशी शिट्टी वाजवली! डॉलफिन आपल्या मित्राला बघून खुश झाला.





दुसऱ्या दिवशी  सॉयर परत विंटरला बघायला गेला. डॉलफिनची  ट्रेनर  चिंतेत होती कारण विंटरने अजून पोहण्याचा प्रयत्न केला नव्हता.



पण, जेव्हा सॉयरला बघितलं तेव्हा विंटरने आपल्या शरीराला एक झटका मारला आणि तो सॉयरच्या जवळ जाण्याचा प्रयत्न केला. सॉयरने हळूहळू आपला हात पुढे करून विंटरच्या डोक्याला हात लावला. विंटरने एक  श्वास सोडला, त्याचा मित्र तिथं होता.

त्यानंतर सॉयर रोज दवाखान्यात जावू लागला. तो रोज विंटरला बरं होतांना बघत असे. सॉयर आणि हेज़लने विंटरला मदत करण्यासाठी विशेष जेवण तयार केलं.





रात्री झोपेपर्यंत सॉयर, डॉल्फिंनवर संशोधन करत होता.

विंटर अजूनही सामान्य डॉलफिन सारखा पोहू शकत नव्हता. पण तो पाण्याच्या पृष्ठभागावर तरंगत राही. तो आपले पंख हलवत तळ्यात चारी बाजूला फिरत होता. तो सॉयरबरोबर खेळत होता, तो पंख हलवत सॉयरच्या अंगावर पाणी उडवत होता.

विंटरला खेळण्यांशी खेळायला आवडत होतं. तो कधी-कधी आपल्या तोंडात सॉयरच्या हातातलं खेळणं ओढण्याचा प्रयत्न करत असे.





एक दिवस, ट्रेनर्सला विंटरच्या पाठीवर सूज दिसली. मग डॉ. हास्केट यांनी विंटरच्या मणक्याचा एक्स-रे काढला.

एक्स-रे मुळे कळलं की तो ज्यापद्धीतीने पोहत होता त्याने त्याच्या मणक्याचे हाड ठिसूळ होत होते. सामान्य डॉल्फ़िन आपले शरीर वर-खाली करत पोहत, तसे विंटर करत नव्हता.



डॉ. हास्केट यांनी सांगितलं की माणूस आणि डॉल्फ़िन दोघांचा मणका त्यांच्या ह्रदयाची गती आणि श्वास नियंत्रित करतो. जर विंटर आपले शरीर वर-खाली करायला शिकला नाही तर त्याचा मणक्याचे हाड खराब होईल. यामुळे तो मरूही शकतो..





त्यामुळे सॉयर, विंटरची खूप चिंता करत होता. पण त्याला कळत नव्हते काय करावे ते?





कृत्रिम अवयवांना "प्रोस्थेटिक्स“ म्हणतात. सॉयरने विचार केला की, डॉ. मैक्कार्थी, विंटरसाठी एक प्रोस्थेटिक शेपूट बनवू शकतील का? खुशखबर! डॉ. मैक्कार्थी, विंटरला बघण्यासाठी यायला तयार झाले.



सॉयरने आपल्या चुलत भावाशी याबाबत बोलला. सैन्यात असतांना काईलला पायाला लागलं होतं. डॉ. मैक्कार्थी नावाच्या डॉक्टरांनी त्याला चालण्यास मदत व्हावी म्हणून त्याच्यासाठी प्लास्टिकची एक कृत्रिम काठी तयार केली होती. काइलच्या मते डॉ. मैक्कार्थी प्लास्टिकचे कृत्रिम पाय सुद्धा तयार करत.

डॉ. मैक्कार्थी यांनी आधी त्या भागाचा एक साचा तयार केला जिथं विंटरची शेपूट होती.

डॉक्टरांनी विंटरची शेपटी तयार करण्यासाठी मोल्डचा उपयोग केला. आता विंटर आपल्या नव्या शेपटीची चाचणी घेवू शकत होता.





त्यादिवशी सॉयर आणि दवाखान्यातील प्रत्येकजण चिंतेत होता. विंटर आपल्या नव्या शेपटीचा उपयोग करू शकेल का?

डॉ. मैक्कार्थी यांनी तयार केलेली प्रोस्थेटिक शेपटी लावल्यानंतर विंटरला तळ्यात सोडलं. त्यांनी हळूहळू विंटरला सोडण्याचा प्रयत्न केला, पण तो ओरडायला आणि इकडेतिकडे पळायला लागला. विंटरला आपली नवी शेपटी फारशी आवडली नाही आणि तो ती शेपटी सारखी तळ्याच्या काठावर मारू लागला. शेवटी शेपटी तुटली.



सॉयर आणि इतर लोक हे बघून खूप दुःखी झाले.
पण डॉ. मैक्कार्थी आता हार मानायला तयार नव्हते.

त्यांनी विंटरसाठी एका नवीन पद्धीतीने एक वेगळ्या प्रकारचा प्रोस्थेटिक तयार करण्याचा निर्णय घेतला.



मग विंटरची नवी आणि अजून चांगल्या शेपटीची चाचणी घेण्याची वेळ आली. जेव्हा ती प्रोस्थेटिक शेपूट फिट केली तेव्हा दवाखान्यातील सगळेजण श्वास रोखून वाट बघू लागले. विंटरने आपली नवी शेपटी बघितली आणि तिला हलवलं. तो हळूहळू आपली शेपटी वर-खाली, खाली-वर हलवू लागला. आता तो पोहत होता. विंटर आता बरा होणार होता.



एका बहादुर मुलाच्या खास मैत्रीमुळे आणि काही चांगल्या लोकांच्या मदतीमुळे डॉल्फिनला एक नवी शेपटी मिळाली आणि तो पोहायला शिकला.



## डॉल्फिनचे सत्य

- विंटर एक बॉटल-नोज़ डॉल्फिन आहे
- डॉल्फ़िन जरी माश्यासारखा दिसत असला तर तो माणसासारखा एक स्तनधारी आहे. डॉल्फ़िन आपल्या डोक्यावरील ब्लो-होलने श्वास घेतो.
- बॉटल-नोज़ डॉल्फ़िन 10 ते १४ फिट लांब असू शकतो आणि त्याचं वजन ११०० पौंड पर्यंत असू शकते.
- डॉल्फ़िन, नेहमी समुहाने पोहतो. त्या समूहांना थवा म्हणतात.
- डॉल्फ़िन मुख्यतः मासे खातात. पण स्क्विड आणि झिंगा सुद्धा खातात.

**समाप्त**

# खरा  विंटर

खरा  विंटर डॉल्फ़िन खुश आणि स्वस्थ आहे.

तो  फ्लोरिडाच्या

*क्लियरवॉटर मरीन एक्वेरियम*

राहतो..

